**नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाच्या अधिनियमातील तरतूदीनुसार राज्य निवडणूक आयोगाकडे जमा होणाऱ्या निधीमधून आयोगाच्या कार्यालयातील कर्मचाऱ्यांना निवडणूकीच्या कामासाठी ५ वर्षातून एकदा पारीश्रमिक देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- रानिआ-२०१६/३६२/प्र.क्र.११६/कार्या-रानिआ(३७)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- १० जुलै , २०२४

**संदर्भ :-** १) शासन निर्णय क्रमांक रानिआ-२०१६/३६२/प्र.क्र.११६/का-३७,
दिनांक २९ ऑक्टोबर, २०१६

**प्रस्तावना:**

भारतीय संविधानातील ७३ व ७४ व्या घटना दुरुस्तीनुसार देशातील प्रत्येक राज्यात स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निवडणुकांसाठी राज्य निवडणूक आयोगाची स्थापना करावयाची असून महाराष्ट्रात दिनांक २६ एप्रिल १९९४ रोजी राज्य निवडणूक आयोग अस्तित्वात आला आहे. तेव्हापासून आयोगामार्फत लोकसभा व विधानसभा निवडणुकांच्या धर्तीवर राज्यात स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निवडणुका घेण्यात येत आहेत. राज्यात सुमारे २९,००० स्थानिक स्वराज्य संस्थांच्या सार्वत्रिक निवडणुका दर ५ वर्षांनी घेण्यात येऊन त्याद्वारे सुमारे २.५ लाख लोकप्रतिनिधी निवडले जातात. निवडणुकांची ही प्रक्रिया निरंतर सुरू असते. या निवडणुकीवरील खर्चाची जबाबदारी विविध अधिनियमातील तरतूदीनुसार त्या त्या स्थानिक स्वराज्य संस्थाची असून ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांच्याबाबतीत (जिल्हा परिषदा/ पंचायत समिती, ग्रामपंचायत) ती राज्य शासनाची असते.

२. राज्य निवडणूक आयोगाच्या कार्यालयाच्या वेतन व वेतनेतर खर्चाची जबाबदारी राज्य शासनाची असली तरी या तरतुदीमधून कोणत्याही कल्पक व नवीन उपाययोजना करणे शक्य होत नाही, तसेच निवडणुकीच्यावेळी ही तरतूद अत्यंत अपुरी पडते. स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निवडणूकांसाठी अधिनियमातील तरतूदींनुसार राज्य निवडणूक आयोगाकडे जमा होणारा निधि राज्य निवडणूक आयोग कार्यालयाचे वेतनेतर खर्चासाठी वापरण्याकरिता ठेव स्वरुपात कोषागारात जमा करुन तो वापरण्याबाबत दि.२९.१०.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये आदेश देण्यात आलेले आहेत.

३. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाच्या निवडणुकांसाठी विहित केलेल्या अधिनियमांतील तरतूदीनुसार राज्य निवडणूक आयोगाकडे जमा होणाऱ्या निधीचा विनियोग करण्याबाबत शासन निर्णय दिनांक २९.१०.२०१६ च्या परिच्छेद ९ (iV) मध्ये राज्य निवडणूक अयोगाकडे जमा होणाऱ्या निधीमधून आयोगाच्या कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी यांना **"पाच वर्षातून एकदा स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निवडणुकांसाठी एक महिन्याचे मूळ वेतन इतकी रक्कम पारिश्रमिक / मानधन म्हणून खर्च करता येईल."** या वाक्याचा समावेश करण्यास वित्त विभागाने काही अटी अधीन मान्यता दिली आहे. यास्तव वित्त विभागाने नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून संदर्भाधिन दिनांक २९.१०.२०१६ च्या शासन निर्णयामध्ये उचित सुधारणा करुन सुधारीत शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

या शासन निर्णयान्वये पुढील बाबीस मान्यता देण्यात येत आहे.

**दिनांक २९.१०.२०१६ च्या परिच्छेद ९ (iV) मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे :-**

"नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाकडून अंशदान म्हणून थेट राज्य निवडणूक आयोगाकडे जमा झालेला निधी निवडणुकीशी निगडीत सर्व कल्पक उपाययोजना, प्रशिक्षण व क्षमता बांधणी, जनजागृती, अभ्यास दौरे, संशोधन व विश्लेषण, नवीन प्रयोग, तसेच इतर तत्सम उपक्रम राबविण्यासाठी त्याचप्रमाणे निवडणूकीशी संबधित साहित्य खरेदी, इत्यादीसाठी खर्च करता येईल. त्याचबरोबर सदर निधीमधून राज्य निवडणूक आयोगाच्या कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी यांना पाच वर्षातून एकदा स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निवडणुकांसाठी एक महिन्याचे मूळ वेतन इतकी रक्कम पारिश्रमिक/मानधन म्हणून खर्च करता येईल."

२. सदर पारिश्रमिक/मानधन हे स्थानिक स्वराज्य संस्थांच्या प्रत्यक्ष निवडणुकांच्या कालावधीतील कामांसाठी राज्य निवडणूक आयोगाच्या अधिकारी/कर्मचारी यांना सदर सर्व निवडणुकांचे कामकाज संपल्यानंतरच अनुज्ञेय राहील. तसेच निवडणूकांशी संबंधित खर्च करतांना पारिश्रमिक/मानधनाच्या रकमेची द्विरुक्ती होणार नाही, याची दक्षता घेण्याची सर्वस्वी जबाबदारी राज्य निवडणूक आयोगाची राहील.

३. सदर निधी खर्च करतांना, उक्त संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णय दिनांक २९.१०.२०१६ नुसार उघडलेल्या राज्य निवडणूक आयोगाच्या राष्ट्रीयकृत बँक खात्यात पुरेशी शिल्लक रक्कम असल्याची खातरजमा करण्याची सर्वस्वी जबाबदारी राज्य निवडणूक आयोगाची राहील. सदर पारिश्रमिक/मानधन अदा करताना शासनावर कोणताही आर्थिक भार येणार नाही, यादी दक्षता राज्य निवडणूक आयोगाने घ्यावी.

४. सदर खर्च करतांना उक्त संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णय दिनांक २९.१०.२०१६ च्या परिच्छेद ९ (iV) नुसार गठीत समितीसमोर प्रस्ताव सादर करण्याची तसेच निधीचे वेळोवेळी लेखापरीक्षण करण्याची दक्षता राज्य निवडणूक आयोगाकडून घेण्यात येईल.

५. उक्त संदर्भ क्रमांक (१) येथील दिनांक २९.१०.२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील अन्य सर्व अटी कायम राहतील.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या संमतीने व त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक -१६७/व्यय-४, दिनांक २७/२/२०२४ अन्वये व त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णय तात्काळ अंमलात येईल.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०७१०१५१७१६८००७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KRANTI BHIMRAO PATIL

Digitally signed by KRANTI BHIMRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=82bdf2956da62b4fc2f658725d7587906d3cf8eb3117ad97f90ef418d0d39a41, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4CB4EDEE9A9967B63A896631DCC4A6E70FF0378E5AF6387779BF67DE75ED5B49, cn=KRANTI BHIMRAO PATIL
Date: 2024.07.10 15:29:36 +05'30'

**( क्रांती पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र राज्य**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२. मा.आयुक्त,राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र राज्य मुंबई -४०० ०३२
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१,मुंबई-४०० ०२०
४. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई- ४०० ०२०
५. लेखाधिकारी, भारतीय रिझर्व्ह बँक, फोर्ट, मुंबई-४०० ०३२
६. संचालक,लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई -४०० ०३२
७. सह संचालक,लेखा व कोषागारे संचालनालय, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालया समोर, मुंबई-४०० ०३२
८. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई-४०० ०५१
९. वित्त विभाग/विनियम, व्यय-४,
१०. नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
११. ग्रामविकास व पंचायत राज विभाग, मंत्रालय मुंबई
१२. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन २५
१३. निवड नस्ती.